**महाराष्ट्र विकास सेवा गट -अ मधील अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी/प्रकल्प संचालक संवर्गातील अधिकाऱ्यांना अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) संवर्गात निव्वळ तात्पुरती पदोन्नती देण्याबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
शासन आदेश क्रमांक : मविसे-१०२०/प्र.क्र.४९/२०२०/आस्था-३,
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
दिनांक: ०९ सप्टेंबर, २०२१.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र विकास सेवा गट -अ मधील अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी /प्रकल्प संचालक या संवर्गातील (वेतन स्तर एस-२५ : ७८८००-२०९२००) खालील अधिकाऱ्यांना अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) या संवर्गात (वेतन स्तर एस-२७ : ११८५००-२१४१०० ) निव्वळ तात्पुरती/तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे.सदर पदोन्नत होणाऱ्या अधिकाऱ्यांना नागरी सेवा मंडळाच्या शिफारशी तसेच सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने खालील तक्त्यातील त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र . ०३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | पदोन्नतीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री.गिरीश दिनकर भालेराव ,<br>उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई | उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई | सध्याच्या कार्यरत पदी |
| २. | श्री.शरद दिनकरराव कुलकर्णी,<br>अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,नांदेड | उप आयुक्त(आस्थापना),विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती | रिक्तपदी |
| ३. | श्री.संभाजी भगवंतराव लांगोरे,<br>प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा परिषद, पुणे | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, अहमदनगर | श्री.जे.एस.भोर यांच्या सेवानिवृत्तीनंतर रिक्त होणाऱ्या पदी |
| ४. | श्री.दिनेश दगडू डोके,<br>अतिरिक्त आयुक्त , समाज कल्याण आयुक्तालय, पुणे | अतिरिक्त आयुक्त ,समाज कल्याण आयुक्तालय, पुणे | प्रपत्र बढती |

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | पदोन्नतीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| ५. | श्री.प्रमोद सोपान शिंदे, खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री गृह (ग्रामीण), वित्त, नियोजन, राज्य उत्पादन शुल्क, कौशल्य विकास व उद्योजकता आणि पणन विभाग यांचे कार्यालय मंत्रालय, मुंबई | खाजगी सचिव ,मा.राज्यमंत्री गृह (ग्रामीण), वित्त, नियोजन, राज्य उत्पादन शुल्क, कौशल्य विकास व उद्योजकता आणि पणन विभाग यांचे कार्यालय मंत्रालय, मुंबई | प्रपत्र बढती |
| ६. | श्री.राजाराम बाबासाहेब दिघे, संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, ग्रामीण गृहनिर्माण, महाराष्ट्र राज्य , नवी मुंबई | संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, ग्रामीण गृहनिर्माण, महाराष्ट्र राज्य , नवी मुंबई | सध्याच्या कार्यरत पदी |
| ७. | श्री.बाळासाहेब मुरलीधर मोहन, प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा परिषद, धुळे | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, जळगाव | रिक्तपदी |
| ८. | श्री.प्रताप रंगनाथराव सवडे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, जालना | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, बुलढाणा | रिक्तपदी |
| ९. | श्री.योगेश सोपानराव महांगडे , खाजगी सचिव, मा.मंत्री ,उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे कार्यालय मंत्रालय, मुंबई | खाजगी सचिव, मा.मंत्री उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे कार्यालय मंत्रालय, मुंबई | प्रपत्र बढती |
| १०. | श्री.राहुल कृष्णाजी साकोरे , (नियुक्तीशिवाय) | उप आयुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे | रिक्तपदी |
| ११. | श्री.माणिक नामदेव दिवे , प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा परिषद, पालघर | सहसचिव, राज्य सेवा हक्क आयोग, कोकण महसूली विभाग, बेलापूर, नवी मुंबई | प्रतिनियुक्ती |
| १२. | श्री.विजय शंकर मुळीक, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, परभणी | उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे | रिक्तपदी |
| १३. | श्री.रणधीर भिमसिंग सोमवंशी, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,रायगड | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,रायगड | सध्याच्या कार्यरत पदी |

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | पदोन्नतीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १४. | श्री.एस.डी.जोशी,अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, लातूर | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, अमरावती | रिक्तपदी |

२. सदर अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) संवर्गातील निव्वळ तात्पुरती पदोन्नती मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१६ ब यांच्या शासन निर्णय दि.०७.०५.२०२१ मधील तरतूदी नुसार पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि .२५.०५.२००४ च्या स्थितीनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधिन राहून भरण्यात येत आहेत.

रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७८/२०२१ मध्ये मा.उच्च न्यायालय,मुंबई यांनी दि.२५.०५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधिन राहील .

३. वरील अधिकाऱ्यांना अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) संवर्गात खालील अटींच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे :-

**<u>अटी व शर्ती :-</u>**

३.१) वरील अधिकाऱ्यांना देण्यात येणारी अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) संवर्गातील निव्वळ तात्पुरती पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

३.२) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्यांना पदावनत करण्याच्या अधिन सदर तात्पुरत्या पदोन्नत्या देण्यात येत आहेत.

३.३) सदरची पदोन्नती अत्यंत तात्पुरत्या स्वरूपात प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात आली आहे .

३.४) या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३.५) वरील अधिकाऱ्यांपैकी प्रपत्र बढती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन ,बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने ) नियम,१९८१ मधील नियम ४०, परिशिष्ट-२, अट क्र.१८ च्या अधिन राहून प्रपत्र बढती देण्यात येत आहे.

४. संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) संवर्गातील निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेल्या वरीलप्रमाणे अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत सुचना द्याव्यात.

५. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) संवर्गातील निव्वळ तात्पुरती पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रूजु व्हावे तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी सदर पदाचा पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा. संबंधित अधिकाऱ्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन नियुक्ती रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी . तसेच "संबंधित अधिकाऱ्यांना पदावर रूजु झाल्याशिवाय पदोन्नती लागू होणार नाही".

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२१०९०९११२६११७७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

Dr Vasant Gopal Mane

Digitally signed by Dr Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19c1f05a32104713094b1babbae721a60140a8f1f9e16ca9d8dc3eaf7de15d65, cn=Dr Vasant Gopal Mane
Date: 2021.09.09 17:34:15 +05'30'

**( डॉ.वसंत माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव,

२) मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव,
३) मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव,
४) मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव,
५) मा. अतिरिक्त मुख्य सचिव (ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक,
६) विभागीय आयुक्त (सर्व),
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व),
८) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व),
९) महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
१०) संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत.),
११) कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास विभाग,
१२) निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्राम विकास विभाग.